# विद्यादात्री वसुप्रदा मोडी लिपी

श्रीमती कांचन कराई

संदेश विनिमयाच्या दृष्टीने भाषा जितकी महत्त्वाची ठरते तितकीच संदेशांचे जतन करण्याच्या दृष्टीने लिपी महत्त्वाची आहे. विस्मरण टाळण्यासाठी आणि अवगत ज्ञानाचा पुन:पुन्हा उपयोग करण्याच्या दृष्टीने भाषा लिपीबद्ध करणे आवश्यक ठरतेच परंतु विवेकहीन बुद्धीने केलेला ज्ञानाचा मौखिक प्रसार टाळून, काही ज्ञान केवळ विशिष्ट कार्यासाठी उपयोगात आणणे, गुप्तता बाळगणे ह्यासाठीदेखील माहिती लिपीबद्ध करणे गरजेचे असते. भारतात ब्राह्मी लिपी ही अनेक प्राचीन लिपींची जननी म्हणून ओळखली जाते. ब्रह्माची लिपी, इयं धम्म लिपी ह्यासारख्या शब्दांनी बौद्ध आणि जैन साहित्यामधून ब्राह्मी लिपी उल्लेखिली आणि गौरवली गेली आहे. ह्या ब्राह्मी लिपीपासूनच बाळबोध किंवा देवनागरी लिपीची उत्पत्ती झाली. देवनागरीची जलद लिपी म्हणून ओळखली जाणारी आणि पिशाच्च लिपी, राक्षस लिपी, भूत लिपी यासारख्या विशेषणांनी ओळखली गेलेली वळणदार मोडी लिपी' ही ब्राह्मी आणि देवनागरी ह्या दोन लिपींचा सुरेख संगम आहे.

गेल्या काही वर्षांत मोडी लिपीबद्दल बरीच माहिती इंटरनेट आणि पुस्तकांच्या माध्यमातून उपलब्ध झाली आहे. ह्या माहितीमध्ये मोडी लिपीबद्दल काही प्राथमिक गोष्टी ठळकपणे उल्लेखिलेल्या असतात:

१. मोडी ही भाषा नसून लिपी आहे.

२. १२ व्या शतकात यादवांच्या राज्याचे करणाधीप हेमाडपंत ह्यांच्यामुळे मोडी लिपी प्रचलित झाली.

३. लेखनशैलीनुसार मोडी लिपीला यादवकाल ते आंग्लकाल अशा ४-५ भागांत विभागले गेले आहे.

४. मराठ्यांचा इतिहास अभ्यासण्यासाठी मोडी लिपीतील खरी कागदपत्रे हे एक महत्त्वाचे साधन आहे.

कागदाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत एक सरळ शिरोरेघ आखून त्याखाली मोडी अक्षरे लपेटीयुक्त स्वरूपात अखंड लिहित जाणे हे मोडी लिपीचे प्रमुख वैशिष्ट्य. त्यानंतर अक्षरांच्या ऱ्हस्व-दीर्घ भेदाची न्यूनता, शुद्धलेखन, व्याकरण आणि शब्दतोडीचा अभाव ही वैशिष्ट्येदेखील ओघाओघाने लक्षात येतात. वाचन करताना शब्दतोड लक्षात न आल्यास होणारा विपर्यास कधी मनोरंजक तर कधी गंभीर ठरतो.

आज जागोजागी, अगदी इंटरनेटवरसुद्धा मोडी लिपी प्रशिक्षणाचे वर्ग आयोजिले जातात. एखाद्या व्यक्तीला मनापासून मोडी लिपी शिकण्याची इच्छा असल्यास सध्या उपलब्ध असलेल्या मोडी लिपीच्या पुस्तकांवरूनही मोडीची मुळाक्षरे शिकणे आणि प्राथमिक वाचन करणे अगदी सहज शक्य आहे. मात्र त्यापुढे जाऊन इतिहासाचा अभ्यास करणे अथवा लिप्यंतरकार म्हणून व्यवसाय करण्यासाठी मोडी लिपीमधील कागदपत्रे वाचण्याचा निरंतर सराव असणे आवश्यक आहे. मोडी लिपीची खरी ओळख होते ती अशा वाचनाच्या सरावामुळे. प्राथमिक अभ्यास करताना शिकलेली मुळाक्षरे, बाराखडी, धड्यांचे वाचन आणि प्रत्यक्ष कागदपत्रांमधील मोडी अक्षर ह्या दोन्हींमध्ये लक्षणीय अंतर दिसू लागते. अभ्यासक्रमामधून माहित झालेल्या मोडी लिपीच्या कालखंडांशी संबंधित कागदपत्रे वाचली की तत्कालिन उपलब्ध लेखनसाहित्यामुळे निर्माण झालेली मोडी लिपीची अनिवार्यता कळून येते. भ, ड, त, स, खा, पा, यासारख्या अक्षरांचे तत्कालिन लेखनिकांनी आपल्या सोयीनुसार परिवर्तन करून



Kanchan Karai

घेतलेले रूप दिसू लागते. शिरोरेघा आणि मोडी अक्षरे ह्यांचा विचार करता पेशवेकालीन किंवा आंग्लकालिन कागदपत्रांमधून दिसणारी मोडी हे मोडी लिपीचे आधुनिक रूप आहे हे सहज कळते. अभ्यासकाने आपली जिज्ञासू वृत्ती जागृत ठेवल्यास मोडी अक्षरांमधील इतरही अनेक रहस्ये कळू लागतात.

मोडी लिपीमधील ऐतिहासिक कागदपत्रे वाचताना तत्कालिन राजकीय इतिहास आणि त्या काळचे सामाजिक जीवन, अर्थव्यवस्था, संस्कृती ह्यांची आपल्याला ओळख होऊ लागते. शतकानुशतके महाराष्ट्रावर झालेल्या परकीय आक्रमणांमुळे आणि परकीयांच्या शासनपद्धतीमुळे मराठी भाषेमध्ये अपरिहार्यपणे वापरले जाणारे अरबी, फारसी शब्द, धार्मिक चालीरीती पाळताना हिंदू कालगणना परंतु पत्रव्यवहारासाठी उपयोगात आणलेल्या इस्लामी कालगणना, ज्युलियन आणि ग्रेगोरियन ह्या ख्रिस्ती कालगणनांमुळे आजही शिवजयंती किंवा तत्सम प्रसंगासाठी इंग्रजी दिनांक निश्चित करताना गोंधळ उडण्याचे कारण, आर्थिक व्यवहारासाठी वापरलेली निरनिराळी चलने, पत्रलेखनाचे नियम अशी अनेक सत्य मोडी लिपीमधील ऐतिहासिक कागदपत्रे वाचताना उलगडू लागतात.

प्रजाहितदक्ष छत्रपती शिवाजी महाराजांनी परकीय सत्तांविरुद्ध लढा देऊन स्वराज्य स्थापना करतानाच मराठी भाषेवर झालेल्या परभाषेच्या आक्रमणालाही थोपविण्याचे प्रयत्न केले. म्हणूनच राज्यव्यवहार कोशाची निर्मिती झाली आणि शिवराज्याभिषेकपूर्व काळातील मोडी पत्रांमध्ये दिसणारे अरबी, फारसी मायने आणि इस्लामी कालगणना जाऊन शिवराज्याभिषेक दिनानंतर मराठमोळे मायने आणि हिंदू कालगणना दिसू लागल्या.

**महाराष्ट्रात मोडी लिपीचा प्रसार झाला तो मुख्यत्वे मराठ्यांच्या राजकीय पत्रांमुळे आणि ह्या पत्रव्यवहारामुळेच मोडी लिपीला महाराष्ट्राबाहेरचा प्रवासही घडला. मराठे जिथवर गेले तिथवर त्यांनी पत्रव्यवहारासाठी मोडी लिपी वापरली. म्हणूनच आज दिल्लीपासून तंजावरपर्यंत मोडी लिपीमधील कागदपत्रे त्या-त्या पुराभिलेखागारांमध्ये जतन करून ठेवलेली आढळतात. मोडी लिपीला महाराष्ट्राबाहेर मुडीया, वाणियावटी, लुंडीमुंडी, रजवाडी अशा निरनिराळ्या**

> ९) 'ॐ भूः भुवः स्वाहा' हा प्रसिद्ध मंत्र ----- या नावाने ओळखला जातो.
> अ) जगती ब) गायत्री क) अनुष्टुभ ड) त्रिष्टुभ
> १०) संस्कृतमध्ये रात्रीला समानार्थी शब्द खालीलपैकी कोणता नाही?
> अ) रजनी ब) शर्वरी क) निशा ड) उषा

**नावांनी ओळखले जाते. महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेर खाजगी संग्रहात मोडी कागदपत्रे बाळगणाऱ्यांची संख्याही मोठी आहे. परदेशातील पुराभिलेगारांमध्येही मोडी लिपीमधील पत्रांचा संग्रह आहे.**

मोडी लिपीचे सौंदर्य खऱ्या अर्थाने दृष्टीस पडते ते पेशवेकालीन पत्रांमधून. बोरूची विशिष्ट रचना आणि लपेटीयुक्त सलग लेखन करताना हाताला लाभलेली गती, ह्यांच्या संयोगातून अक्षरांची वळणे अधिकच आकर्षक आणि लिपीच्या उपयुक्ततेसोबत लेखनामधील व्यवस्थितपणाही वाढत गेलेला दिसतो. त्यामुळे मोडी लिपीमधील लेखन पूर्वीइतके दुर्बोध न राहता अधिकाधिक वाचनीय होऊ लागलेले दिसते. आंग्लकाळात लेखनसाहित्य अधिक प्रगत झाले खरे परंतु त्यामुळे मोडी लिपीच्या सौंदर्याला नवी झळाळी लाभण्याऐवजी तिचे मूळ सौंदर्यही झाकोळले गेले. बोरूऐवजी टाक किंवा निब वापरल्यामुळे अक्षर पातळ येऊ लागले. दिवसेंदिवस मजकुरातील क्लिष्टपणा वाढत गेला. परिणामी मोडी लिपीची लपेटीयुक्त लेखनपद्धती हे वैशिष्ट्यच आंग्लकाळातील मोडी पत्रवाचनास हानिकारक ठरू लागले.

मुद्रणकलेचे तंत्र छ. शिवाजी महाराजांच्या काळापासूनच महाराष्ट्राला ठाऊक असले तरी त्या काळी मोडी लिपीमधून मुद्रण करणे अवघड होते. प्राच्यविद्या अभ्यासक आणि अक्षर जुळवणीकार चार्ल्स विल्किन्स यांनी मोडी लिपीचा पहिला धातू अक्षरसंच (ſशींरश्र षेपीं) इ.स. १७०७ मध्ये घडवला होता. त्यानंतर विल्यम कॅरे ह्या ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी पं. वैजनाथ यांच्या साहाय्याने प. बंगालमधील श्रीरामपूर येथे इ.स. १८०५ मध्ये मोडी शिलामुद्रक (Lithograph) घडवला आणि 'अ डिक्शनरी ऑफ द मराठा लँग्वेज' हा शब्दकोश प्रकाशित केला. त्यांनी इतरही काही पुस्तकांचे मुद्रण मोडी लिपीमधून केले. मुंबईहून प्रकाशित होणाऱ्या 'बॉम्बे कुरियर' ह्या इंग्रजी वर्तमानपत्रात इ.स. १८०२ मध्ये प्रथमच मोडी

लिपीतून जाहिराती प्रकाशित केलेल्या होत्या. इ.स. १९०५ मध्ये बेळगाव येथून 'खबरदार' नावाचे मोडी लिपीतील वृत्तपत्र प्रकाशित झाले होते. मोडी लिपीच्या उपयोगितेचा विचार करून मोडी वाचनमालेची काही पाठ्यपुस्तके १९ व्या शतकात प्रकाशित झाली होती. पण १८-१९ व्या शतकातील वेगवान सामाजिक आणि राजकीय घडामोडींमुळे मराठी, हिंदी आणि संस्कृत ह्या तिन्ही भाषांसाठी सुयोग्य पर्याय म्हणून देवनागरी लिपीला उजवे स्थान मिळाले. अखेर प्रशासकीय आणि खाजगी व्यवहारांसाठी मोडी लिपीचा उपयोग व्हावा की न व्हावा ह्यावर झालेल्या वादविवादामध्ये छत्रपती शाहू महाराजांनीदेखील (चौथे शाहू) इ.स. १९१७ च्या मार्च महिन्यात मोडी लिपीला वगळण्याच्या पक्षात आपला कौल दिला. तरीदेखील स्वातंत्र्योत्तर काळापर्यंत मोडीप्रेमींमुळे ही लिपी आपले अस्तित्व टिकवून होती. मात्र इ.स. १९५० ह्या वर्षी तत्कालिन 'बॉम्बे स्टेट'चे मुख्यमंत्री बाळ गंगाधर खेर ह्यांच्या प्रस्तावानुसार मोडी लिपी शासकीय व्यवहारांतून वैधपणे वगळण्यात आली.

पुढल्या ८-९ वर्षांत मोडी लिपीचा लोकव्यवहारातील वापर पूर्णपणे बंद झाला खरा पण एक नवीनच अडचण निर्माण झाली - मराठ्यांचा इतिहास अभ्यासण्यासाठी खरी कागदपत्रे वाचावी लागत आणि त्यातील बहुतांश कागदपत्रे ही मोडी लिपीतच होती. अखेर इ.स. १९६० मध्ये संयुक्त महाराष्ट्राचे पहिले मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण यांनी मोडी लिपी जाणकारांनी पुढे यावे असे वृत्तपत्रांतून आवाहन केले पण त्या आवाहनाला प्रतिसाद मिळाला तो एका परदेशातील प्राध्यापकांकडून. जपानच्या टोक्यो विद्यापीठामधील प्रा. फुकाजावा ह्यांनी त्यांच्या देशातील मोडी लिपी माहितगारांचा एक चमू भारतात पाठविण्याची तयारी दर्शवली आणि ही बाब अतिशय गंभीरपणे घेऊन पुन्हा एकदा मोडी लिपीला पुनरुज्जीवित करण्याचे प्रयत्न महाराष्ट्रात सुरू झाले. मोडी लिपीच्या ह्या चळवळीसाठी मराठी परिषदेचे अध्यक्ष मा. शरद पवार यांनीदेखील मोलाचे सहकार्य दिले. दै. लोकसत्ता वृत्तपत्रामधून तंजावरच्या सरस्वती महालामधील कागदपत्रांबद्दल माहिती प्रसिद्ध झाली आणि त्यानंतर जयहिंद प्रकाशनचे मालक ग. का. रायकर यांच्या अध्यक्षतेखाली जागतिक मराठी परिषदेची उपशाखा म्हणून १८ जानेवारी १९९१ रोजी 'मोडी लिपी शिक्षण प्रसारक' मंडळाची स्थापना झाली. गिरगाव ते देवरूखपर्यंत ह्या मंडळाच्या अनेक शाखा निर्माण झाल्या. कै. मनोहर जागुष्टेसारखे निष्णात मोडी अभ्यासक ह्या संस्थेचे संचालक होते. आज महाराष्ट्रात मोडी लिपी शिकविणाऱ्या अनेक संस्था उदयास आलेल्या आहेत.

आज मोडी लिपीचे प्रशिक्षण घेऊन अनेक मोडीवाचक निर्माण होत आहेत. गेल्या काही वर्षांत अशी परिस्थिती होती की मोडी वाचक तर आहेत परंतु त्यांना सरावासाठी कागदपत्रेच उपलब्ध नाहीत. सुदैवाने मोडी लिपीमधील शिवकालीन, पेशवेकालीन आणि आंग्लकालीन खऱ्या पत्रांचा संग्रह पुस्तकरूपाने आणि इंटरनेटवर मोडी वाचकांसाठी खुला झालेला आहे, त्याचा मोडी वाचकांनी लाभ घ्यायला हवा. लाखो, करोडो ऐतिहासिक मोडी कागदपत्रे पुराभिलेखागारात लिप्यंतराची वाट पाहत पडून आहेत हे सत्य असले तरी अशी ऐतिहासिक कागदपत्रे केवळ तोंडी मागणीवर उपलब्ध होत नाहीत हेदेखील सत्य आहे. मराठ्यांच्या इतिहासाचा अभ्यास करण्यासाठी पुराभिलेखागारील मोडी कागदपत्रे अभ्यासायची असतील तर शैक्षणिक किंवा मान्यताप्राप्त संस्थांचे शिफारसपत्र सादर करावे लागते. मोडी लिपीचे व्यावसायिक लिप्यंतरकार होणे हा पर्याय अनेकांना दुय्यम उत्पन्नाचे साधन म्हणून आकर्षक वाटतो. मात्र, ह्या कामातून मिळणाऱ्या उत्पन्नापेक्षा लिप्यंतरकार म्हणून त्या व्यक्तीचे उत्तरदायित्व कैक पटींनी अधिक असते हे मोडी वाचकांनी लक्षात घ्यावे. महाराष्ट्र शासनाच्या पुराभिलेखागारातर्फे प्रतिवर्षी किंवा दोन वर्षांतून एकदा होणाऱ्या मोडी लिपी प्रशिक्षणामध्ये उत्तीर्ण झाल्यास मिळणाऱ्या प्रमाणपत्रामुळे समाजाकडून लिप्यंतरकाराच्या व्यवसायाकडे अधिक गंभीरपणे पाहिले जाते. त्यामुळे मोडी लिपीमधील कागदपत्रांच्या वाचनाचा निरंतर सराव असणे हे व्यावसायिकदृष्ट्यादेखील आवश्यक ठरते.

मोडी लिपीचा अभ्यास म्हणजे केवळ एक प्राचीन लिपी शिकून मोकळं होणं नाही तर ती एक निरंतर चालणारी साधना आहे. संतश्रेष्ठ श्री नामदेव महाराजांच्या 'एक तरी ओवी अनुभवावी' ह्या उक्तीप्रमाणे प्रतिदिन मोडी लिपीमधील किमान एक वाक्य तरी वाचावे आणि लिहून काढावे. मोडी लिपी सरस्वती आणि लक्ष्मीचं मूर्तिमंत प्रतीक आहे. ज्याने मनापासून मोडी लिपीची साधना केली असेल त्याचा हात मोडी लिपीदेखील कधीही सोडत नाही.

Kanchan Karai

आजच्या संगणकीय युगामध्ये मोडी लिपीला पुन्हा शासकीय व्यवहारात सामावून घेतले जाण्याची शक्यता धूसर आहे पण उपलब्ध मोडी कागदपत्रांचा खजिनाच इतका प्रचंड आहे की आपले संपूर्ण जीवन मोडीच्या अभ्यासासाठी खर्च केले तरी ते सागरातील एका थेंबाप्रमाणे भासेल. लेखनालंकार.

|| मोडी सेवेसी तत्पर ||

संदर्भ :

प्राचीन भारतीय लिपीमाला - रायबहादूर पंडित गौरीशंकर हिराचंद ओझा

भारतीय लिपींचे मौलिक एकरूप - पण्डित गणपतिशास्त्री हेब्बार

मोडीच्या प्रसार अभियानाचे एकांडे शिलेदार - श्रुती डेगवेकर

देवनागरी लिपी उद्गम, विकास, संभावना - ल. श्री. वाकणकर

पुराभिलेखविद्या - प्रा. डॉ. शोभना लक्ष्मण गोखले

अक्षरलेणी - डॉ. मधुकर कुलकर्णी

आर्यलिपी - गो. का. चांदोरकर

Practical Treatise upon Modern Printing Machinery and Letterpress Printing - Wilson and Grey

The demise of the Modi script - Pushkar Sohoni (Modern sian Studies Issue 51/3)

Shahu Chhatrapati - Royal Revolutionary - D.V. Keer

Illustrative Modi Documents - Capt. Dr. B.G. Kunte

Reviving Modi-Script - Rajendra Thakare

History of Modi Script - Rajesh Khilari

Modirchives Dot In



श्रीमती कांचन कराई



सौ. कांचन कराई

मोडी दस्तऐवजाच्या मराठी (देवनागरी) लिप्यंतरकार

कार्यालय: दादर पूर्व, मुंबई.

मोबाईल: ९९२००२८८५९

इमेल: kanchan@kanchankarai.com

वेबसाईट: http://dastavej.kanchankarai.com